शासनाकरीता नक्षलविरोधी अभियानाकरीता खरेदी करण्यात येणा-या H १४५ या नवीन हेलिकॉप्टरच्या प्रशिक्षणाकरीता विमानचालन संचालनालयातील तीन वैमानिकांना पाठविणेबाबत मान्यता तसेच प्रशिक्षणावरील खर्चाच्या ५० टक्के रक्कम अग्रिम देणेबाबत. ..

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. विचासं-११२३/प्र.क्र.११५/२८-अ,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ३२.
दिनांक: १७ एप्रिल, २०२३.

**वाचा:** १) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.विचासं-१११८/प्र.क्र.३५/२८-अ, दि.२३ एप्रिल,२०१८ अन्वये निर्गमित करण्यात आलेले मा.शक्ती प्रदत्त समितीच्या दि.६.०४.२०१८ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. विचासं-१११८/प्र.क्र.८०/२८-अ, दिनांक ८/५/२०१८

३) विमानचालन संचालनालयाचे दिनांक १५/३/२०२३ व १०/४/२०२३ चे पत्र व सहपत्र

**प्रस्तावना :**

विमानचालन संचालनालयातील तीन वैमानिकांना डी.जी.सी.ए. च्या नियमानुसार दरवर्षी उजळणी प्रशिक्षण घेणे अनिवार्य आहे. या प्रशिक्षणाकरीता एअरबस या कंपनीबरोबर केलेल्या कराराची मुदत संपल्याने वैमानिकांचा हवाई प्रवास, प्रवास विमा, व्हीसा, वास्त्यव्याचा खर्च, इतर प्रवास खर्च व इतर अनुषंगिक कर इ. खर्च तसेच प्रशिक्षणावरील येणारा खर्च शासनास करावा लागणार आहे. एच १४५ या हेलिकॉप्टरच्या उजळणी प्रशिक्षणाकरीता या कार्यालयातील तीन वैमानिकांना डल्लास अमेरिका येथील प्रशिक्षण केंद्रामध्ये दि.२२/५/२०२३ ते ४/६/२०२३ या कालावधीत प्रशिक्षण आयोजित करण्यात आले आहे. या प्रशिक्षणावरील होणारा खर्च मे.ॲरो एअरक्राफ्ट सेल्स अँड चार्टर्ड प्रा.लि. या सध्याच्या व्यवस्थापन कंपनीमार्फत करण्याचे प्रस्तावित आहे. या अनुषंगाने मे.ॲरो एअरक्राफ्ट या कंपनीने सादर केलेल्या खर्चाच्या तपशीलानुसार तीन वैमानिकांच्या प्रशिक्षणासाठी रु.८१,२६,४००/- एवढया खर्चास मंजूरी प्रदान करण्यास तसेच संदर्भ क्र.३ अन्वये केलेल्या विनंतीनुसार वैमानिकांच्या प्रशिक्षणाबाबतचा स्लॉट लवकरात लवकर

आरक्षित करण्यासाठी मे.ॲरो एअरक्राफ्ट कंपनी यांना प्रशिक्षणावरील एकूण खर्चाच्या ५० टक्के अग्रिम म्हणजेच रु.४०,६३,२००/- इतकी रक्कम अदा करण्याचे आदेश निर्गमित करण्याबाबतची व उपरोक्त प्रशिक्षणाकरीता विमानचालन संचालनालयातील कॅ.संजय कर्वे,मुख्य वैमानिक (हेलिकॉप्टर), कॅ.महेंद्र दळवी, वरिष्ठ वैमानिक (हेलिकॉप्टर) व कॅ.मोहित शर्मा, वैमानिक (हेलिकॉप्टर) या तीन वैमानिकांना दिनांक १९/५/२०२३ (म.नं.) रोजी मुख्यालय सोडण्यास मान्यता देऊन शासन निर्णय निर्गमित करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

विमानचालन संचालनालयातील तीन वैमानिकांना डी.जी.सी.ए. च्या नियमानुसार दरवर्षीप्रमाणे उजळणी प्रशिक्षण देण्यात येणार आहे. त्यानुसार विमानचालन संचालनालयातील खालील तीन वैमानिकांना त्यांच्या नावापुढे नमूद केलेल्या कालावधीमध्ये उजळणी प्रशिक्षणासाठी परदेशी जाण्यासाठी व त्याअनुषंगाने होणा-या खर्चास तसेच दिनांक १९/५/२०२३ (म.नं.) रोजी मुख्यालय सोडण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | वैमानिकाचे नाव व पदनाम | प्रशिक्षणाचा दिनांक | प्रशिक्षणाचा एकूण कालावधी | प्रशिक्षणाचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | कॅ.संजय कर्वे, मुख्य वैमानिक | दि.२२.०५.२०२३ ते दि.४.०६.२०२३ | १४ दिवस | डल्लास (अमेरीका) |
| २ | कॅ,महेंद्र दळवी. वरिष्ठ वैमानिक | दि.२२.०५.२०२३ ते दि.४.०६.२०२३ | १४ दिवस | डल्लास (अमेरीका) |
| ३ | कॅ.मोहित शर्मा वैमानिक | दि.२२.०५.२०२३ ते दि.४.०६.२०२३ | १४ दिवस | डल्लास (अमेरीका) |

२. उपरोक्त प्रशिक्षणासाठीच्या खर्चाचे विस्तृत परिशिष्ट-१ यासोबत जोडण्यात आले आहे.

३. सदर प्रशिक्षणासाठी एकूण तीन वैमानिकांचा अमेरीका येथील प्रवास खर्च, निवास खर्च, दैनिक भत्ता ,प्रवास खर्च (विमान), प्रवास विमा व इतर कर असा एकूण रु.८१,२६,४००/- एवढा खर्च येणार आहे. या एकूण खर्चाच्या ५० टक्के अग्रीम म्हणजेच रु.४०,६३,२००/- (रुपये चाळीस लाख त्रेसष्ट हजार दोनशे फक्त) इतका खर्च खालील लेखाशीर्षाखालील सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा व त्याच उपलेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्र ए-४,
"२०७०-इतर प्रशासनिक सेवा
(००) (११४) परिवहन साधनांची खरेदी व परिरक्षण
(००) (०२) विमानचालन सल्लागार, महाराष्ट्र शासन
(२०७० ०१५६) ५० इतर खर्च

४. या प्रित्यर्थ उप संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून व संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२३०४१७१६००२३६८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHILPA ABHAY CHACHAD

Digitally signed by SHILPA ABHAY CHACHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=3f0b1454eadcb46569c38e868a5b441a8a32b442036ce5c8ffbed5e862cc4202, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=15FE38A4E995535864D6D7BC4CB39F75BB8A6906B9DA526DCB4921B96EE9B6EF, cn=SHILPA ABHAY CHACHAD
Date: 2023.04.17 16:06:07 +05'30'

**(शिल्पा चाचड)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत माहितीसाठी सादर,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई ५६.
३. उप संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई ५६.
४. महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. महालेखापाल, ( लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. सामान्य प्रशासन विभाग /कार्या.२५, मंत्रालय, मुंबई ३२.
९. निवड नस्ती.

# परिशिष्ट-१

## राज्य शासनाच्या हेलिकॉप्टरवरील वैमानिकांच्या डल्लास (अमेरिका) येथील प्रशिक्षणासाठी लागणाऱ्या खर्चाचे विस्तृत विवरणपत्र

| अ.क्र. | खर्चाची बाब | वैमानिकांच्या प्रशिक्षणाकरिता येणारा खर्च |
|---|---|---|
| १ | मुख्यालय सोडण्याची तारीख | दिनांक १९/५/२०२३ (म.नं.) |
| २ | प्रशिक्षणाचा कालावधी | १४ दिवस (प्रशिक्षण दि. २२/०५/२०२३ ते ०४/०६/२०२३) |
| ३ | प्रशिक्षणासाठी येणारा खर्च (Recurrent ground & Simulator training) | रु.४५,२६,४०० /- |
| ४ | तीन वैमानिकांचा प्रवास खर्च | रु. २१,००,०००/-<br>अथवा प्रत्यक्ष खर्च (जो कमी असेल ती ) |
| ५ | निवास, टॅक्सी प्रवास, दैनिक भत्ता, प्रवास विमा व व्हीसा खर्च | रु.१५,००,००० /-<br>अथवा प्रत्यक्ष खर्च (जो कमी असेलती ) |
| | **एकूण खर्च रुपये** | **रु.८१,२६,४००/- -**<br>अथवा प्रत्यक्ष खर्च (जो कमी असेल ती ) |